**लोकनेते बाळासाहेब देसाई यांचे दौलतनगर, ता.पाटण, जि.सातारा येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. स्मारक- २०२१/प्र. क्र.१३१/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २२ मार्च, २०२२

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११५/२५३/प्र.क्र.२६०/२९, दि.१९.११.२०१५
२) शासन निर्णय, शासन निर्णय क्र. स्मारक ३११७/प्र.क्र.१६९/२९, दिनांक ०५.०३.२०२०
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२०
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.१६९/२९, दि.२३.११.२०२०
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक ३११७/प्र.क्र.१६९/२९, दि.११.०८.२०२१
७) जिल्हाधिकारी,सातारा यांचे पत्र क्र. जिनिससा/पाटण/बादेस्मा/२०२१-२२/का-६/२१४९, दि.०१.१०.२०२१
८) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
९) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक २०२१/प्र.क्र.१३१/२९, दि.२५.११.२०२१
१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. स्मारक २०२१/प्र.क्र.१३१/२९, दि. २८.०१.२०२२
११) जिल्हाधिकारी,सातारा यांचे पत्र क्र. जिनिससा/पाटण/बादेस्मा/२०२१-२२/का-६/४३७/२०२२, दि.०३.०२.२०२२

**<u>प्रस्तावना</u>:-**

लोकनेते बाळासाहेब देसाई यांचे दौलतनगर, ता.पाटण, जि.सातारा येथील स्मारकाच्या टप्पा-२ अंतर्गत मुलांमुलींचे वसतिगृह तसेच सभागृहाचे बांधकाम करण्यात येणार असून त्याकरिता जिल्हाधिकारी,सातारा यांनी दिनांक ६/१/२०२० अन्वये सादर केलेल्या रु.१४.९९ कोटी रक्कमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास शासन निर्णय क्रमांक स्मारक ३११७/प्र.क्र.१६९/२९, दिनांक ५.३.२०२० अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत स्मारकाकरिता संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये रु.१.०० कोटी इतका निधी, संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये रु. १.१६ कोटी, संदर्भ क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये रु.१.१६ कोटी तसेच संदर्भ क्र. १० येथील शासन निर्णयान्वये रु. ५५.१३ लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात संदर्भ क्र. ८ अन्वये वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून रु. ३१,२८,५००/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

या शासन निर्णयाद्वारे लोकनेते बाळासाहेब देसाई यांचे दौलतनगर, ता.पाटण, जि.सातारा येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता रु.३१,२८,५००/- (रु. एकतीस लक्ष अठ्ठावीस हजार पाचशे फक्त) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -ए-४,
मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे
८०- सर्वसाधारण
८००- इतर खर्च
(००) (००) (०२) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम (कार्यक्रम)
(२०५९ ३१७७), ५३ मोठी बांधकामे

वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र. क्र. ४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ मधील तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच वितरीत निधी ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू आर्थिक वर्षामध्ये स्मारकाच्या कामासाठी खर्च करण्याची जिल्हाधिकारी, सातारा यांनी दक्षता घ्यावी.

३. उपरोक्त निधीमधून खर्च करण्यासाठी, जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा (सांकेतांक क्रमांक २३०१००३४३७) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधीच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्याची तसेच महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, सातारा यांची राहील.

४. हा शासन निर्णय, प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागांना वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तिय अधिकारांतर्गत असलेल्या प्रकरणांबाबत देण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ सोबतचे परिशिष्ट मधील अ.क्र.९ मधील प्रत्येक मुद्यांची पुर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२२१७४२५५६४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JANA JIVA VALVI

Digitally signed by JANA JIVA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=816d3fe4c7042f66b4ac73a1f0087cd8fda3e115d42dc8b54c0e783064c80dc1, pseudonym=BC7303629AB7AFCA8CE15C55D2BEFE77F3006E6E, serialNumber=FD6F9785FE220B2C0F30D422D401E2DFC838A0D9EC621401534F5B36EAF57F26, cn=JANA JIVA VALVI
Date: 2022.03.22 17:46:24 +05'30'

**( ज. जि. वळवी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४. मा.पालकमंत्री, जिल्हा सातारा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (प्र.सु., र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

७. जिल्हाधिकारी, सातारा.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१३. निवासी उपजिल्हाधिकारी,सातारा
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सातारा.
१५. कक्ष अधिकारी (कार्या-२५ / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन १४४३), मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
१९. निवडनस्ती (कार्यासन २९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.